वर्ष : दूसरे , अंक : ५१
दिनांक : २५.१२.२००९

ई - साहित्य प्रकाशन



# इस सवाल का जवाब नहीं

**संपादक -**
सचिन काकडे ( मुंबई )

**सहसंपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )

## या अंकात वाचा..

- प्रश्नार्थक कविता ?
- संपादकीय

Netअक्षरी

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

## ....प्रश्न पडत राहतात....

प्रश्न पडत राहतात
पावसाइतक्याच सहज आणि स्वाभाविकपणे
काहीजण वाहून जात असतीलही
पण अनेकांना जीवनरस मिळतो त्यातूनच

प्रश्न पडत राहतात
कुठलंही कारण पुरेसं असतं त्यांना
किंवा कधीकधी कारण नसलं तरी चालतं
अवघ्या अस्तित्वाला वेढून
प्रश्नांचे ढग जेव्हा चोहिकडे अंधार करतात
तेव्हाही कुठलातरी अंकुर असतोच कुठेतरी
फुलण्यासाठी आसुसलेला
आणि कुठेतरी एखादा चातकही असतोच
चोच उघडून बसलेला
मान्य आहे,काही वांझ ढग असतात आकाशात
पण म्हणून काही पावसाचं महत्व कमी होत नाही
तसंच प्रश्नांचंही

प्रश्न पडत रहावेत
उत्तरं मिळालीच पाहिजेत,असं थोडंच आहे ?

- ज्ञानेश पाटील ( जळगाव )



# ....अनुत्तरित प्रश्न आणि माझं जागरण....



अनुत्तरित प्रश्न आणि माझं जागरण
अशीच मग मी विचार करत जागते..रात्रभर
झोप काही येत नाही , तेच अनुत्तरित प्रश्न..
मी काय कमावलं ? काय गमावलं ?
खरंच मी काही कमावलं का ?
खरंच काही गमावलं का ?
हे नाते म्हणजे काय असते ?
अनुत्तरित प्रश्न आणि माझं जागरण..रात्रभर
गर्भात ९ महिने ९ दिवस राहून मी काय मिळवले ?
जीव ?
जीव मिळवला का मी ? कशासाठी हा जीव ?
काय करायचं ह्या जीवाचं ?
कैक गोष्टींनी ग्रासलेला जीव
भौतिक सुखाच्या मागे लागलेला जीव
कशासाठी हवाय हा जीव ?
दुःखी व्हायला का ?
शरीराच्या दुःखामुळे जीव का दुःखी होतो ?
काय हवंय काय ह्या जीवाला ?
कसं सुखी करु मी ह्याला ?
असेच अनुत्तरित प्रश्न आणि माझं जागरण..रात्रभर
पैशाच्या मागे लागलीये
कशासाठी ? काय मिळवतेय मी पैसा कमावून
चैन-आराम ? बस्स ? पण चैन मिळतो का ?खुश आहे का मी ?
सुख असं पैशात विकत घेता येतं का ?
मग सुख कुठे मिळतं ? कसं मिळवू मी सुख ?
पुन्हा अनुत्तरित प्रश्न आणि माझं जागरण..रात्रभर..

- प्रिया गवई ( बंगलोर )

## ....प्रश्न....

सांज सकाळी का मजला स्मरतात प्रश्न
का उत्तरातही अखेर उरतात प्रश्न

का राहतेस तू अबोल समोरी माझ्या
बघ तुझ्या समोरी माझे हरतात प्रश्न

देतात उत्तरे डोळे तू अबोल जरी
नजरा ह्या तुझ्या सखे मज करतात प्रश्न

रेंगाळती प्रश्न तुझ्या ओठांवरी हे
ओठांवरी तुझ्या जणू ते मरतात प्रश्न

सोबतीने तुझ्या दिवस सरतो माझा
रात्र होता काळजात उभरतात प्रश्न

मिळाले उत्तर वादळांना जरी ते
पोट दुष्काळात कुठे भरतात प्रश्न

किती शोधशी सखे उत्तरे कधीची
डोळयांतूनी अश्रूंसहित उतरतात प्रश्न

- सुधीर मुळीक ( मुंबई )



## ....आरश्याने प्रश्न केला....

आरश्याने प्रश्न केला,शोधते तू काय आहे ?
कोणते अश्रू वहाती ? भोगते तू काय आहे ?

ओंजळी मिटल्या तरीही,रिक्त आहे हात अजूनी
ओठ मिटूनी भावनांचे,मागते तू काय आहे ?

का कशाला गूढ वाटे,पण शब्दं का हे कोरडे ?
मूक गिळूनी भावनांचे,सोसते तू काय आहे ?

आरसा पुन्हा विचारी,जाब माझ्या उत्तरांना
जे असे गेलेच निघुनी,मानते तू काय आहे ?

मी आता गाऊन थकले,भाव माझ्या अंतरीचे
नयन तरीही वाहणारे,रेखते तू काय आहे ?

- अस्मिता ( पुणे )



## ....प्रश्न....

रणांगणात घोड्यांप्रमाणे उधळणारे प्रश्न
उत्तरांशिवाय वांझ साले..चिडवणारे प्रश्न

डोळयांमधील सारी स्वप्ने गुंडाळून ठेवा
जीवनभर सोडवत रहा..बदलणारे प्रश्न

धुंद होऊन देत गेलो अडचणीत तुला साथ
हसता हसता सुटून गेले..रडवणारे प्रश्न

तुझ्या माझ्या प्रश्नांच्या गर्दीमध्ये हरवलेत
जमाव होऊन रस्त्यावर उतरणारे प्रश्न

भगवन तुम्ही तुमची गीता अर्जुनाला सांगा
आमच्यासमोर उभे करा..चिघळणारे प्रश्न

जगवणाऱ्यांचा हात हवा पाठीवरती
आनंदा मागेच आहेत..बुडवणारे प्रश्न

- आनंद माने ( मुंबई )



## ....प्रश्नांना प्रश्न....

प्रश्नांना प्रश्न विचारायची
अरेरावी माझी
आणि मग मी उत्तरांसाठी
ताटकळत उभी राहते
जशी बस स्टॉपवर बससाठी

पण मला हवी ती बस कधी वेळेवर येतच नाही
तसंच मग उत्तरांचं सुध्दा
कधी मिळतच नाहीत मला हवी तशी

आणि मग दुसऱ्या बसने मी पुढचा पल्ला गाठते

तसंच उत्तरांचंही
हवं ते उत्तर मिळालं की
स्वतःला आजमावून बघायचं
मिळालेल्या उत्तरावर समाधान मानून जगायचं
यातच खरं सुख आहे

- चैताली म्हापसेकर ( मुंबई )



## ....प्रश्न प्रश्न प्रश्न....

एकदा एक प्रश्न
स्वतःवरच रुसला

उत्तर मिळत नाही म्हणून
फिर फिर फिरला

निरनिराळ्या संदर्भातून
काहीतरी धागा गवसेल
स्वतःच्या उत्पत्तीचा
शेवटी निराश झाला
हताश झाला
आणि आरशासमोर येऊन
स्वतःला न्याहाळू लागला

मग स्वतःच्या प्रतिबिंबाकडे पाहून
हसू लागला
वेड लागलं का त्याला ?
नाही नाही
त्याला त्याच्यातच सामावलेलं पारदर्शित
उत्तर गवसलं होतं

- दीपक साळुंके ( पुणे )



# ....तुज आहे तुजपाशी....

गंमत सांगू ? कधी कधी उत्तरांनाच प्रश्नाची गरज पडते !

विश्वास नाही ना बसत ? पण मी पाहिलंय हे घडतांना..अनेकदा

म्हणजे बघ, उत्तर असतंच आपल्यापाशी
अगदी महत्वाच्या प्रश्नाचं,
आणि आपण मात्र
आलतू फालतू छोट्या प्रश्नांची उत्तर शोधत राहतो
झपाटल्यासारखे !

आणि आपल्यापाशी ज्याचं उत्तर आहे
तो महत्वाचा प्रश्न मात्र कोपऱ्यातच पडून राहतो
आपलं लक्ष जायची वाट पहात

आलतू फालतू छोट्या प्रश्नांची
उत्तरं सापडेनाशी झाली
की आपण चाचपडू लागतो
आपल्या पोतडीत,शोधत की
आपल्यापाशी साहित्य आहे तरी काय ?

आणि मग अचानक हाती लागतं
ते उत्तर..ज्याचा प्रश्न कोपऱ्यात पडून असतो

त्यालाच साक्षात्कार म्हणतं मग जग
आणि आपण मात्र वेडपटासारखे
स्तंभितच जागच्या जागी..
मोठ्ठी परिक्षा संपल्यावर रिकामं वाटतं ना ? तस्से..
आहे की नाही गंमत ?

- प्रभा प्रभुदेसाई ( आसाम )



## ....प्रश्न....

सांज होताच माझ्या मागे पळतात प्रश्न
उत्तरांना जसं पिळलं,तसे गळतात प्रश्न

पावलं सरळ चालली तरी मन चुकतंच
तुझ्या घराच्या वळणावर,वळतात प्रश्न

माझे भरलेले डोळे,तुलाच दिसत नाहीत
कसा आहेस विचारल्यावर चिघळतात प्रश्न

ह्या नात्याचा एकदाचा सोक्ष मोक्ष लावावा
पण तू समोर येताच,सारे अडखळतात प्रश्न

तू जीवनात नाहीस,हे फारच छान आहे
वास्तवाच्या सरणावर,स्वप्नाचे जळतात प्रश्न

मुखवटा उतरवून जेव्हा जेव्हा ठेवतो बाजूस
या भामट्या दुनियेचे,हमखास टळतात प्रश्न

प्रश्नांच्या गर्भातून जरी,जन्म घेतात प्रश्न नवे
निर्माण झालेल्या प्रश्नचिन्हातून,का कळता प्रश्न

- सनिल पांगे ( मुंबई )



## ....प्रश्न तसाच राहतो....

मी हटायचे की हट्टाने रेटायचे
प्रश्न तसाच राहतो
भीड चेपायची की भीक घालायची
प्रश्न तसाच राहतो

मीपण जपायच की माझं स्वत्व
प्रश्न तसाच राहतो
कुढत जगायच की जगवायचं अस्तित्व
प्रश्न तसाच राहतो

अभिमान जपायचा की स्वाभिमान
प्रश्न तसाच राहतो
मोडून वाकायच की वाकून मोडायच
प्रश्न तसाच राहतो

पेटून उठायचं की कुणीतरी पेटायच
प्रश्न तसाच राहतो
झोकून द्यायच की वाकून पहायच
प्रश्न तसाच राहतो
आपणच आपलेपण सिध्द करायचे
विस्तव आला तरी स्वत्व आता जपायचे
शिवबा नाही होता आले हे तर चालायचेच
नंगी तलवार उचलता येते एवढे तरी करायचे

मग प्रश्न कधी प्रश्न उरणार नाहीत
उत्तरे कुणाकडे मागावी लागणर नाहीत
आता फक्त ताठ कणा अन मानानं जगायचं
पाठीवरचा  वार फक्त छातीवर घ्यायला शिकायच

- प्रसाद जोशी ( पुणे )

# प्रश्न आणि उत्तर असते शेजारी शेजारी - संपादकीय

....प्रश्न....

एक कोडं..सुटेल अशी आशा
सोडवतांना नशा , सुटलं तर दशा
मनाची..
प्रेमाची,नात्याची,आयुष्याची,जगण्याची
जन्माची उरल्यास मरणाची
आपण जगतोय तर कोडं पडायलाच हवं
ते पडतंही आणि रडतंही
कधी चिमुकल्या बाळासारखं
तर कधी भुतासारखं रडत मागे लागतं
खरंच ते मागे असतं की 'आपण'
हाही एक प्रश्नच ,हे सुध्दा कोडंच
सालं आपण सगळं आयुष्य विसरुन
त्याच्यामागे लागतो,ते सोडवायला
ते ध्येय,ती जिद्द,ती नशा
कशाचं काही भान उरत नाही
फुटकळ अशा उत्तरांनी
तेव्हा मन भरत नाही
मग जरा अजून पुढे जायचं
प्रश्नासमोर उत्तरासाठी
आपणसुध्दा प्रश्न व्हायचं
मग तो हसतो
हवातसा दिसतो
दिसला तर उत्तर
नाहीतर चुकतो
आपण
शिकतो आपणच,जो शिकवतो
प्रश्न त्यालाच म्हणायचं ,तोच सांगतो कसं जगायचं

- सचिन काकडे ( मुंबई )

रसिकहो,
२०१० उंबरठ्यावर येऊन ठेपलंय.
नेटाक्षरीचा २००९ सालाचा हा समारोप अंक प्रश्नार्थक कविता घेऊन
आम्ही तुम्हासमोर सादर केला.
पण,२०१० मध्ये सुरु होणाऱ्या नूतन वर्षात मात्र आम्ही
तुमच्या समोर घेऊन येऊ..
तुमच्याच मनातल्या प्रश्नांची उत्तरे असणाऱ्या दिलखेचक कविता
आणि नवीन प्रश्नांची साखळी निर्माण करणाऱ्या कवितादेखील !
कारण,जे न देखे रवी ते देखे कवी।।
तर मग,जल्लोषात सामोरे जाऊया २०१० ला..
आणि २००९ ला प्रेमपूर्वक निरोप देऊन २०१० ला मिठीत घेऊ या..
अहो,ही बेईमान जिंदगी कितीही प्रश्न का निर्माण करु देत..कशाला घाबरता ?
कारण, प्रश्न आणि उत्तर असते शेजारी शेजारी..

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.

हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

## नुतन वर्षाच्या हार्दिक शुभेच्छा !

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com